राज्यात एकसारख्या असलेल्या योजना कमी करुन त्या अन्य योजनांमध्ये समाविष्ट करुन योजना कमी करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एमआयएस-२८१५/प्र.क्र.१४७/नवि-०४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०१६

**प्रस्तावना :-**

नियोजन विभागाशी संबंधित KRA मध्ये "राज्यात एकसारख्या असलेल्या योजना एकत्रित करुन त्या अन्य योजनांमध्ये समाविष्ट करुन योजना कमी करणे" हा विषय समाविष्ट करण्यात आला होता. त्या अनुषंगाने नियोजन विभागाने (१) राज्यस्तर व जिल्हास्तरावर द्विरुक्तीने कार्यरत असलेल्या योजना, (२) विविध शिर्षांखाली कार्यरत असलेल्या व एकत्रित करता येणाऱ्या योजना, (३) केंद्रशासनाने अकार्यान्वित केलेल्या योजना, व (४) ज्या योजनांचा नियतव्यय मागील ३ वर्षांपासून शून्य आहे अशा योजना या निकषांआधारे ज्या योजना वगळणे शक्य आहे, अशा योजनांची यादी तयार केली. नियोजन विभागाने तयार केलेल्या यादीमधील नगर विकास विभागाशी संबंधित वसई विरार शहर नागरी पायाभूत सुविधा प्रकल्प व अग्निशमनाचे बळकटीकरण या तसेच यशवंतराव चव्हाण नागरी अनुसुचित जाती, जमाती व इतरांसाठी कौशल्य विकास योजनेच्या या योजनांचा निधी अन्य योजनेतून वितरीत करण्यात असल्याने त्यासाठी मागील तीन वर्षात स्वतंत्र नियतव्यय चिन्हांकित करण्यात आला नव्हता. सबब, नियोजन विभागाच्या सुचनेनुसार सदर योजनांचे योजना संकेतांक व परिणामी योजना रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद कारणास्तव वसई-विरार शहर नागरी पायाभूत सुविधा प्रकल्प (योजना संकेतांक १११११०००२४), अग्निशमनाचे बळकटीकरण (योजना संकेतांक ११११११०००२५) व यशवंतराव चव्हाण नागरी अनुसुचित जाती, जमाती व इतरांसाठी कौशल्य विकास योजना (योजना संकेतांक १२१११६०००८) या योजनांचे तीनही योजनांचा निधी अस्तित्वातील अन्य योजनेतून वितरित होत असल्यामुळे या योजनांचे उपरोक्त नमूद विशिष्ट योजना संकेतांक रद्द करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१०२९१७१८१२६४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2016.10.29 17:21:06 +05'30'

**( पां. जो. जाधव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
२. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
३. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (सामाजिक न्याय), सा.न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कार्यासन अधिकारी (नवि-२०/नवि-३३)
८. निवडनस्ती, (नवि-०४).